**नाशिक महानगरपालिका.**
डॉ.डी.बी.पाटील वैद्यकीय अधिकारी यांची
शासकीय सेवा नाशिक महानगरपालिका
सेवेसोबत जोडणे बाबत.

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:एनएमसी-२००२/८१४/प्र.क्र.४७/नवि-२५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २१ सप्टेंबर, २००४.

**पहा :-** (१) आयुक्त, नाशिक महानगरपालिका यांचे क्रमांक-आस्था/वशि/१७५६/२००३ व दि.३०.९.२००३ चे पत्र

(२) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, धुळे यांचे क्रमांक-जिरुधु/ग्रारु-आस्था/डॉ.पाटील व दिनांक ३१.१२.१९९९ चे पत्र.

(३) महासंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्रमांक -मवैआसे/२/राजी/डॉ.पाटील/२४/२००३ व दिनांक ९.४.२००३ चे पत्र.

**प्रस्तावना :-** डॉ.डी.बी.पाटील हे दिनांक २८.२.१९८५ ते ११.४.१९९१ या कालावधीत शासनाच्या महाराष्ट्र वैद्यकीय सेवा गट-अ (वर्ग-२) या संवर्गात कार्यरत होते व त्यानंतर ते दिनांक १२.४.१९९१ पासून नाशिक महानगरपालिका सेवेत वैद्यकीय अधिकारी पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होऊन तेथे सद्य:स्थितीत कार्यरत आहेत. डॉ.पाटील यांनी प्रथम दिनांक १८.३.२००२ च्या निवेदनाव्दारे शासनास तसेच संबंधीत कार्यालयांस केलेल्या विनंतीनुसार ते शासकीय सेवेत असताना त्यांच्या खाती जमा असलेल्या सर्व राशी व रजा, नाशिक महानगरपालिकेकडे वर्ग करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करुन त्यांची शासकीय सेवा ही नाशिक महानगरपालिकेच्या सेवेशी सलग (निवृत्ती वेतनार्ह) धरणेबाबतचा मुद्दा शासनाच्या विचाराधीन होता; त्यावर सार्वजनिक आरोग्य विभाग व वित्त विभागाच्या सल्ल्याने खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:** महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ मधील नियम ४ च्या तरतुदीनुसार राज्य शासनाकडील दिनांक २८.२.१९८५ ते ११.४.१९९१ या कालावधीची सेवा, निवृत्ती वेतनासाठी अर्हतकारी सेवा म्हणून डॉ.पाटील यांना नाशिक महानगरपालिकेच्या त्यांच्या विद्यमान सेवेसी जोडून देण्यास नैसर्गिक न्यायाच्यादृष्टीने एक वर्जीत बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

०२. डा.पाटील विद्यमान वैद्यकीय अधिकारी, नाशिक महानगरपालिका यांच्या उक्त शासकीय सेवा कालावधीतील सेवेचे उपदान, निवृत्ती वेतन, रजावेतन अंशदान इत्यादी देय बाबी नाशिक महानगरपालिकेकडे वर्ग करण्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने महासंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई यांना आवश्यकते आदेश देण्यात यावेत.

०३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग यांच्याकडील क्रमांक - ४६ /सेवा-७ व दिनांक १६.३.२००४ आणि सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्याकडील दिनांक ३१.३.२००४ च्या अनौपचारीक संदर्भानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(म.दि .आडिवरेकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
प्रधान सचिव, (सुधारणा) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
महासंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
उप संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, नाशिक मंडळ, नाशिक.
आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक .(३ प्रती)
निवडनस्ती (कार्यासन, नवि-२५)

०२. डा.पाटील विद्यमान वैद्यकीय अधिकारी, नाशिक महानगरपालिका यांच्या उक्त शासकीय सेवा कालावधीतील सेवेचे उपदान, निवृत्ती वेतन, रजावेतन अंशदान इत्यादी देय बाबी नाशिक महानगरपालिकेकडे वर्ग करण्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने महासंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई यांना आवश्यकते आदेश देण्यात यावेत.

०३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग यांच्याकडील क्रमांक - ४६ /सेवा-७ व दिनांक १६.३.२००४ आणि सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्याकडील दिनांक ३१.३.२००४ च्या अनौपचारीक संदर्भानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(म.दि .आडिवरेकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
प्रधान सचिव, (सुधारणा) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
महासंचालक, आरोग्य सेवा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
उप संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, नाशिक मंडळ, नाशिक.
आयुक्त, नाशिक महानगरपालिका, नाशिक .(३ प्रती)
निवडनस्ती (कार्यासन, नवि-२५)